एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदुरबार अंतर्गत चिंतामणी महिला एज्युकेशन सोसायटी, पिंपळे, ता. अंमळनेर, जि. जळगाव संचलित अनुदानित आश्रमशाळा, शनिमांडळ, ता.जि. नंदुरबार, ही आश्रमशाळा स्थलांतरीत करुन मौजे शिंदगव्हाण, ता.जि.नंदुरबार येथे स्थलांतर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः अआशा-२०२३/प्र.क्र.२१०/का-११

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :-१८ जुलै, २०२३

वाचा:

१. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. अआशा.२०२३/प्र.क्र.७१/का.११, दिनांक २३.०८.२०२३

२. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांचे पत्र क्र.अनुआशा. २०२३ /प्र.क्र.४३ /का.०७ (४)/६६८३, दिनांक ०३.१०.२०२३.

३. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. अआशा.२०२३/प्र.क्र.२१०/का.११, दिनांक ०७.११.२०२३.

४. अध्यक्ष, श्री चिंतामणी महिला एज्युकेशन सोसायटी, पिंपळे बु., ता. अमळनेर, जि. जळगाव यांचे दिनांक ०६.०६.२०२४ रोजीचे पत्र.

५. प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र., नंदुरबार यांचे पत्र क्र. अनुआशा-२०२४/प्र.क्र./का.११ (५)/३३४५/नंदुरबार, दिनांक १८.०६.२०२४

६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.अनुआशा. २०२४/ प्र.क्र./ का.११ (२)/ २८७६, दिनांक १९.०६.२०२४.

७. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. अनुआशा. २०२३ /प्र.क्र.४४/का.७ (२)/४०६६, दिनांक २०.०६.२०२४.

**प्रस्तावना**

श्री चिंतामणी महिला एज्युकेशन सोसायटी, पिंपळे बुद्रुक, ता. अमळनेर, जि. जळगाव या संस्थेस आदिवासी विकास विभाग शासन निर्णय दिनांक ०७.११.२०२३ अन्वये कायमस्वरुपी रद्द करण्यात आलेली “श्री रामचंद्र सेवाभावी बहुउद्देशिय शिक्षण संस्था, गणेशपुर, जि. बुलढाणा संचलित अनुदानित आश्रमशाळा (इयत्ता १ ली ते १० वी) पाळा (खामगांव राजा) ही अनुदानित आश्रमशाळा ही प्राथमिक, माध्यमिक आश्रमशाळा हस्तांतरीत व स्थलांतरीत करुन शनिमांडळ, ता. जि.नंदुरबार येथे सुरु करण्यास परवानगी देण्यात आली आहे.

ए.आ.वि.प्र., नंदुरबार अंतर्गत चिंतामणी महिला एज्युकेशन सोसायटी, पिंपळे, ता. अंमळनेर, जि. जळगाव संचलित अनुदानित आश्रमशाळा, शनिमांडळ, ता. जि.नंदुरबार ही आश्रमशाळा स्थलांतरीत करुन मौजे शिंदगव्हाण, ता.जि.नंदुरबार येथे स्थलांतर करणेबाबतचा संदर्भाधीन क्रमांक ७ येथे नमूद पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

ए.आ.वि.प्र., नंदुरबार अंतर्गत चिंतामणी महिला एज्युकेशन सोसायटी, पिंपळे, ता. अंमळनेर, जि. जळगाव संचलित अनुदानित आश्रमशाळा, शनिमांडळ, ता. जि.नंदुरबार ही आश्रमशाळा स्थलांतरीत करुन मौजे शिंदगव्हाण, ता.जि.नंदुरबार येथे स्थलांतर करण्यास खाली नमुद अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. शाळेच्या पुर्वीच्या ठिकाणी असलेल्या सर्व विद्यार्थ्यांना नवीन ठिकाणी समावून घेण्यात यावे.

२. संस्थेने जुन्या ठिकाणच्या शाळेतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना नवीन ठिकाणी सामावुन घ्यावे.

३. स्थलांतर करण्यात आलेल्या ठिकाणी संस्थेस अनुदानित आश्रमशाळेसाठी आश्रमशाळा संहिता-२०१९ मधील मानकामध्ये नमूद सर्व भौतिक सोयी-सुविधांनी युक्त स्वत:ची सुसज्ज इमारत मान्यतेपासून दोन वर्षात बांधणे बंधनकारक राहील.

४. संस्थेने आश्रमशाळेत वर्गखोल्या व निवासाची स्वतंत्र इमारतीमध्ये व्यवस्था करावी. तसेच इमारतीमध्ये मानकाप्रमाणे स्नानगृहे, शौचालये उपलब्ध करुन द्यावीत आणि शुध्द पाण्याची मुबलक व्यवस्थाही उपलब्ध करुन द्यावी.

५. विद्यार्थ्यांना अनुज्ञेय असणाऱ्या सोयी-सुविधा व साहित्य इ. चा पुरवठा करण्यात यावा.

६. सदर शाळेतील विद्यार्थ्यांचे नवीन ठिकाणी स्थलांतर संस्थेने स्वत: च्या खर्चाने करावे.

७. स्थानांतर झालेल्या शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

८. स्थानांतर झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या / मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.

९. शासनाकडून आश्रमशाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन /वेतनेत्तर अनुदान,विद्यार्थी इत्यादी बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश यांचे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

१०. सदर स्थानांतरणा संदर्भात शासनाकडे अथवा आदिवासी विकास विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्याकडे नव्याने तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा स्थानांतर संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास, स्थानांतर रद्द/शाळेची मान्यता रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सर्व बाबी तपासून व आवश्यक असल्यास वरील अटी/शर्ती व्यतिरिक्त अटींचा समावेश करून चिंतामणी महिला एज्युकेशन सोसायटी, पिंपळे, ता. अंमळनेर, जि. जळगाव संचलित अनुदानित आश्रमशाळा, शनिमांडळ, ता. जि.नंदुरबार या आश्रमशाळेच्या स्थलांतरणा संदर्भात आवश्यक कार्यवाही करुन त्याबाबत शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१८१५०७५८०६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN GORAKSHANATH SATHE

Digitally signed by PRAVIN GORAKSHANATH SATHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=8aeae114bc10bc084ffcdf2ae0c667ca6c3eca844c7809bb00f184ed1dc997ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D0E975C83DB8E2A19FD387F2130D87449EAD27B920A608BF243707CB95AAAA3, cn=PRAVIN GORAKSHANATH SATHE
Date: 2024.07.18 15:19:01 +05'30'

**( प्रविण गो. साठे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदुरबार.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
८. अध्यक्ष/सचिव, चिंतामणी महिला एज्युकेशन सोसायटी, पिंपळे, ता. अंमळनेर, जि. जळगाव.